सैनिकी शाळेतील अतिरिक्त कायम विना अनुदानित तुकडी अनुदानासाठी पात्र ठरविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इसैशा २०१६/प्र.क्र.६ / एसएम ०६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांक : ११ मे, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय,** शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा १०९५/(२७८/९५)/ माशि-७, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५
२) **शासन निर्णय,** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक माशाअ-२००९/(५९९/०९)माशि-१, दिनांक २० जुलै, २००९
३) **शासन निर्णय,** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक माशाअ-२००९/(५९९/०९)माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११
४) **शासन निर्णय,** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक संकीर्ण २०१२/(१५०/१२)/माशि-१, दिनांक १६ जुलै, २०१३
५) **शासन निर्णय,** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्रमांक इसैशा २०१४/प्र.क्र.१४५/एसएम-६, दिनांक ९ ऑक्टोबर, २०१५
६) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. माध्य/क/२८०९८, दि.१५.१२.२०१५

प्रस्तावना-

१.१ राज्यात माध्यमिक स्तरावर सैनिक शिक्षणाची सोय उपलब्ध व्हावी म्हणून उपरोक्त संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ च्या शासन निर्णयान्वये सैनिकी शिक्षण देणा-या शाळा सुरु करण्यात आल्या आहेत.

१.२ राज्यातील कायम विनाअनुदानित तत्वावर परवानगी दिलेल्या माध्यमिक शाळांना अनुदानास पात्र ठरविण्याकरिता संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ अन्वये मुल्यांकनाचे निकष विहित करण्यात आलेले आहेत. सदर निकषानुसार सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणाऱ्या माध्यमिक शाळा व त्यामधील वर्ग / तुकडया अनुदानासाठी पात्र म्हणून घोषित करण्यात येतात. शाळा वर्ग/ तुकडया अनुदानासाठी पात्र ठरल्या असल्या तरी त्यांना अनुदानाचा हक्क प्राप्त होत नाही. अनुदानास पात्र ठरलेल्या शाळा, वर्ग / तुकडया यांना अनुदान देणे हा शासनाचा स्वेच्छाधिकार असून निधीच्या उपलब्धतेनुसार अनुदान दिले जाते. हे अनुदान भूतलक्षी प्रभावाने लागू केले जात नसून निधी उपलब्ध होईपर्यंतची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय होत नाही.

१.३ राज्यातील कायम विनाअनुदान तत्वावर परवानगी दिलेल्या शाळांना /तुकडयाना अनुदान लागू करण्यासाठी मूल्यांकनाचे निकष विहीत करण्यात आलेले आहेत. तसेच राज्यात कायम विनाअनुदान

तत्वावर सुरु असलेल्या शाळांचा शासन निर्णय, दिनांक २० जुलै, २००९ अन्वये कायम शब्द वगळून या शाळांना सन २०१२-१३ पासून अनुदानावर आणण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

१.४ त्यानुसार (१) श्री.विलासराव देशमुख शिक्षण प्रसारक व बहुउद्देशीय संस्था, बुलढाणा संचलित राजीव गांधी मिलीटरी स्कुल, कोलवड, बुलढाणा व (२) श्री दुर्गामाता बहुउद्देशीय क्रीडा व शैक्षणिक संस्था, चिंचोली क्र.२, ता.दिग्रस, जि.यवतमाळ संचलित स्व. ईश्वर देशमुख सैनिकी शाळा, सावंगा (बु.) ता.जि.यवतमाळ या दोन्हीही सैनिकी शाळा मुल्यांकनाचे निकष पूर्ण करीत असल्याने या शाळेत सुरु असलेल्या इयत्ता ८ वी ते १० वीच्या ६ अतिरीक्त तुकडयांना अनुदानास पात्र घोषित करण्याबाबत विभागीय शिक्षण उपसंचालक अमरावती विभाग, अमरावती यांनी संदर्भाधीन दिनांक १५.१२.२०१५ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने सदर दोन्हीही सैनिकी शाळांच्या अतिरीक्त तुकडया अनुदानासाठी पात्र म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>-**

शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्र. माशाअ-२००९/५९९/०९/माशि-१ दिनांक १५ नोव्हेंबर,२०११ आणि दिनांक १६ जुलै २०१३ अन्वये राज्यात कायम विना अनुदानित सैनिकी शाळांच्या मूल्यांकनाचे विहीत निकषांची पूर्तता करणा-या (१) श्री.विलासराव देशमुख शिक्षण प्रसारक व बहुउद्देशीय संस्था, बुलढाणा संचलित राजीव गांधी मिलीटरी स्कुल, कोलवड, बुलढाणा व (२) श्री दुर्गामाता बहुउद्देशीय क्रीडा व शैक्षणिक संस्था, चिंचोली क्र.२, ता.दिग्रस, जि.यवतमाळ संचलित स्व. ईश्वर देशमुख सैनिकी शाळा, सावंगा (बु.), ता.जि.यवतमाळ या दोन्हीही सैनिकी शाळा मुल्यांकनाचे निकष पूर्ण करीत असल्याने या शाळेमधील सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार इयत्ता ८वी ते १० वीच्या ६ अतिरीक्त तुकडयामधील प्रशिक्षित पदवीधर शिक्षकांच्या एकूण १० पदांना खाली नमूद विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून नवीन सुत्राप्रमाणे अनुदानाच्या अटीवर पात्र घोषित करण्यात येत आहे.

१) उपरोक्त शाळांनी संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १५ नोव्हेंबर २०११ व दिनांक १६ जुलै २०१३ मधील सर्व अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

२) अनुदानाचे आदेशाची अंमलबजावणी करण्यापूर्वी संबंधित सैनिकी शाळेची अतिरिक्त तुकडी मुल्यांकनास पात्र ठरली तरी शाळांमध्ये विहीत प्रमाणानुसार मागासवर्गीयांची आरक्षित पदे भरलेली नसल्यास अशी सैनिकी शाळा अनुदानास पात्र ठरणार नाही.

३) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ मधील निकषाची पूर्तता करणे,अधिनियमाची अंमलबजावणी करणे सर्व सैनिकी शाळांना बंधनकारक आहे. तसेच मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार Non Performing/Under Performing/Non Compliance सैनिकी शाळा विहीत पध्दतीने बंद करणे अपेक्षित असल्याने, सैनिकी शाळेतील कायम विना अनुदानित तुकडया अनुदानास पात्र ठरल्या असल्या तरी त्यांनी वरील निकषाची पूर्तता केली असल्याची खात्री करून घेतल्यानंतरच त्यांना प्रत्यक्ष अनुदान देय होईल.

४) सदर सैनिकी शाळेत शिकत असलेल्या विद्यार्थ्यांचे U-DISE नुसार आधारकार्ड प्राप्त करणे आवश्यक राहील.

५) सदर आदेशान्वये सैनिकी शाळेतील अतिरिक्त तुकडी अनुदानास पात्र म्हणून घोषित करण्यात आली असली तरी, त्यास अनुदानाचा हक्क प्राप्त होत नाही. संबंधित सैनिकी शाळांना अनुदान लागू करणे हा शासनाचा स्वेच्छाधिकार असून निधीच्या उपलब्धतेनुसार अनुदान अदा केले जाईल.

६) प्रत्येक सैनिकी शाळेची अतिरिक्त तुकडी ज्या वेळेस मूल्यांकनाचे निकष पूर्ण करेल, त्यानंतर विहीत पध्दतीने मूल्यांकन करून अनुदानास पात्र ठरत असेल त्या वर्षापासूनच सैनिकी शाळा विहीत अनुदानास पात्र ठरेल.

७) सदर अनुदान हे भूतलक्षी प्रभावाने लागू होणार नाही किंवा निधी उपलब्ध होईपर्यंतचा फरक अनुज्ञेय असणार नाही.

८) प्रत्येक वर्गात किमान विद्यार्थी पट संख्या कायम ठेवणे अनिवार्य राहिल. विद्यार्थी नसल्यास सदर वर्ग अनुदानास पात्र ठरणार नाही.

९) सदर शाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांची भरती सेवाप्रवेश विषयक प्रचलित नियमानुसार करणे बंधनकारक राहील. तसेच अनुशेषाची पदे भरणे बंधनकारक राहील.

१०) पात्र घोषित करण्यात आलेल्या सैनिकी शाळांतील अतिरिक्त तुकडीचे आदेश संबंधित शिक्षणाधिका-यानी संबंधित सैनिकी शाळेस १५ दिवसात कळवावेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१२१६३७०७६७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=27e28d18e47077c7c6f72f1caad1c46a2a54bad8e8e20ae7469973186aa51fa1, cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.05.12 16:34:07 +05'30'

**( रा.ग.गुंजाळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½, मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र ½, मुंबई/ नागपूर
६. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
७. विभागीय शिक्षण उप संचालक, अमरावती विभाग, अमरावती.
८. शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा / यवतमाळ
९. निवड नस्ती (एस एम-६).

**"प्रपत्र-अ"**

**शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,क्रमांक: संकीर्ण २०१६/(६/१६)/ एसएम-६, दिनांक ११ मे, २०१७ चे सहपत्र.**

| क्र. | संस्थेचे व शाळेचे नाव | माध्यम | इयत्ता/ वर्ग | शाळेचे क्षेत्र बिगर आदिवासी /टीएसपी / ओटिएसपी / १०३ विकास गट | नवीन सुत्राप्रमाणे अनुदानाच्या अटीवर अनुदानास पात्र ठरणारी पदे | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | डी एड | प्रशिक्षित पदवीधर शिक्षक | एकूण पदे |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री.विलासराव देशमुख शिक्षण प्रसारक व बहुउद्देशीय संस्था, बुलढाणा संचलित राजीव गांधी मिलीटरी स्कूल, कोलवड, ता. जि. बुलढाणा | सेमी इंग्रजी | ८ वी ते १० वी | बिगर आदिवासी | ---- | ६ | ६ |
| २ | दुर्गामाता बहुउद्देशीय क्रीडा व शैक्षणिक संस्था, चिंचोली क्र.२ ता.दिग्रस, जि.यवतमाळ संचलित स्व. ईश्वर देशमुख सैनिकी शाळा, सावंगा, बु. ता. जि. यवतमाळ. | सेमी इंग्रजी | ८ वी ते १० वी | बिगर आदिवासी | ---- | ६ | ६ |

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=27e28d18e47077c7c6f72f1caad1c46a2a54bad8e8e20ae7469973186aa51fa1,
cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.05.12 16:35:46 +05'30'

(रा.ग.गुंजाळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन